मौजे गिरगाव, (ता.तलासरी, जि.पालघर) येथील नळ पाणी पुरवठा योजनेच्या सुधारीत अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः ग्रापापु - १५२०/प्र.क्र.१०७ /पापु -०६**

**गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल, लोकमान्य टिळक मार्ग,**

मंत्रालय, मुंबई-४०० ००१.

तारीख: १७ सप्टेंबर, २०२०.

**वाचा**: -

१) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद पालघर यांचे प्रशासकीय मान्यता आदेश जा.क्र.पाजिप.पापुवि/वशी/पी.बी-१/३१९, दिनांक २४.०५.२०१९.

२) अधीक्षक अभियंता तथा समन्वयक, भारत निर्माण कक्ष, कोकण विभाग यांचे तांत्रिक मान्यता आदेश क्र.भानिक/कोवि/तांशा/११/२०१९, दिनांक २२.०२.२०१९.

३) शासन पत्र क्रमांक ग्रापापु-१५१९/प्र.क्र.१७८/पापु-०६, दिनांक ०९.०३.२०२०.

४) कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, पालघर यांचे सुधारीत तांत्रिक मान्यता आदेश क्र.पीझेडपी/पीबी-२/६, दिनांक १६.०९.२०१९.

५) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद पालघर यांचे पत्र जा. क्र. पाजिप /पापुवि/ वशी/निविदा/३७७/२०१९, दिनांक ३०.०३.२०२०.

**प्रस्तावना** :-

मौजे गिरगाव, (ता.तलासरी, जि.पालघर) येथील नळ पाणी पुरवठा योजनेच्या अंदाजपत्रकास संदर्भ क्रमांक १ अन्वये मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, पालघर यांनी मूळ प्रशासकीय मान्यता प्रदान केली आहे. संदर्भ क्रमांक २ अन्वये अधीक्षक अभियंता तथा समन्वयक, भारत निर्माण कक्ष, कोकण विभाग यांनी अंदाजपत्रकास मूळ तांत्रिक मान्यता प्रदान केली आहे. तथापि, सदर योजनेच्या कामाच्या जादा दराच्या निविदा प्राप्त झाल्यामुळे खर्चात वाढ झाली. सदर योजनेच्या कामाच्या जादा दराच्या निविदेस संदर्भ क्रमांक ३ अन्वये मंजूरी देण्यात आली आहे. कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, पालघर यांनी संदर्भ क्रमांक ४ अन्वये प्रस्तुत योजनेच्या अंदाजपत्रकास सुधारीत तांत्रिक मान्यता दिली आहे. त्यानुसार, मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, पालघर यांनी प्रस्तुत नळ पाणी पुरवठा योजनेच्या आराखड्यास व अंदाजपत्रकास सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव संदर्भाधिन पत्र क्रमांक ५ अन्वये शासनास सादर केला होता. तद्नुषंगाने प्रस्तुत योजनेच्या आराखड्यास व अंदाजपत्रकास सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** :-

मौजे गिरगाव, (ता.तलासरी, जि.पालघर) येथील नळ पाणी पुरवठा योजनेच्या रु.४७९.६६ लक्ष (ढोबळ) ( अक्षरी रुपये चार कोटी एकोणऐंशी लक्ष सहासष्ठ हजार फक्त ) एवढ्या सुधारित किंमतीच्या अंदाजपत्रकास पुढील अटींच्या अधिन राहून सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

अटी

(१) उपरोक्त नमूद सुधारित किंमतीत उर्वरित सर्व कामे २४ महिन्यात (पावसाळा सोडून) पूर्ण करावीत.

(२) या योजनेस सहमती दिलेल्या मूळ प्रशासकीय मान्यतेच्या तसेच सुधारीत तांत्रिक मान्यता देताना नमूद केलेल्या अटी व शर्तीचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

(३) ही योजना पूर्ण झाल्यावर ती संबंधित ग्रामपंचायतीच्या ताब्यात देण्यात यावी. संबंधित कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, पालघर यांच्याकडून योजना प्रत्यक्षात पूर्ण झाली आहे, या आशयाची सूचना मिळाल्याच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत योजना ताब्यात घेण्यास संबंधीत ग्रामपंचायत/जिल्हा परिषद जबाबदार राहील. योजना प्रत्यक्षात पूर्ण झाल्यावर लगेच संबंधित कार्यकारी अभियंता, जिल्हा परिषद व संबंधित ग्रामपंचायतचे अधिकारी यांनी योजनेची संयुक्तपणे पाहणी आयोजित करावी आणि अशा पाहणीत कोणतेही दोष आढळून आल्यास योजना ताब्यात देण्यापूर्वी ते सुधारण्यात यावेत.

(४) ही योजना राबविणे, त्याचे परिरक्षण, दुरुस्त्या (विशेष दुरुस्त्या धरुन) यासाठी दरवर्षी येणारा आवर्ती खर्च भागविण्यासाठी, योजनेतील घसारा किंवा यंत्रसामुग्री नुतनीकरणासाठी संबंधित ग्रामपंचायतीस/जिल्हा परिषदेस शासनाकडून कोणतीही मदत मिळणार नाही.

(५) सदर योजना पूर्ण झाल्यावर स्थानिक स्वराज्य संस्थेने ( संबधित ग्रामपंचायत/ जिल्हा परिषद) योजना हंस्तातरित करुन घेणे बंधनकारक राहील. तसेच योजनेचे लेखे बंद करण्यात यावेत.

(६) सन २०१३ मधील CAG च्या अहवालानुसार राज्यातील २१% पाणी पुरवठा योजना या देखाभाल दुरुस्ती अभावी, वीज देयक न भरल्यामुळे ( Poor maintenance/nonpayment of electricity of bills) बंद पडल्या असल्याचे दिसून येते. यास्तव सदर योजना आर्थिकदृष्ट्या सक्षम राहण्याच्या दृष्टीने पाणीपट्टी दरामध्ये आवश्यकतेनुसार वाढ करण्याची जबाबदारी संबधित ग्रामपंचायत/ जिल्हा परिषद यांची राहील.

(७) हगणदारीबाबतच्या प्रचलित धोरणानुसार कार्यवाही करण्यात यावी.

(८) प्रस्तुत योजना कोणत्याही परिस्थितीत पुनर्सुधारीत केली जाणार नाही याची जबाबदारी जिल्हा परिषदेची राहील.

२. या योजनेच्या सुधारित किंमतीतील वाढीव खर्च रु.५५.१८ लक्ष (अक्षरी रुपये पंचावन्न लक्ष अठरा हजार फक्त) हा राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमाखालील राज्य हिश्श्यातून /जिल्हा नियोजन मंडळाकडून / किमान गरजा कार्यक्रमांतर्गत उपलब्ध होणाऱ्या निधीतून करण्यात यावा.

३. प्रस्तुत योजनेस सुधारीत प्रशासकीय मान्यता ही वित्त विभागाच्या दि. १७ एप्रिल, २०१५ च्या क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२ या शासन निर्णयातील भाग पहिला, उपविभाग-३ मधील अ. क्र. ६ (सहा) परिच्छेद क्र.२७ (अ) अनुसार विभागास प्रदान करण्यात आलेल्या प्राधिकारानुसार देण्यात येत आहेत.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००९१७१४४३३८०१२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Virendra
Waghmare

Digitally signed by Virendra Waghmare
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Supply and Sanitation Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f5d6f126fb2f7be4b1bf6852db246c09b4bc61941abc4ff25b1f136deaa230e1, serialNumber=a85f98e847799004f69b062247054b545938af0b4310575481dee123026d8e87, cn=Virendra Waghmare
Date: 2020.09.17 14:43:49 +05'30'

**( वी. मो वाघमारे )**
**कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
२) मा. अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
३) मा. विरोधी पक्षनेता, विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
४) मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
५) मा. उप सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
६) मा. उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
७) सर्व सन्माननीय सदस्य, विधानपरिषद / विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ, मुंबई
८) मा. मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
९) मा. राज्यमंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
१०) महालेखापाल, लेखा परिक्षा, महाराष्ट्र-१, मुंबई.
११) महालेखापाल, लेखापरीक्षा, महाराष्ट्र-२, नागपूर
१२) अतिरिक्त मुख्य सचिव, नियोजन विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
१३) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
१४) अपर मुख्य सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
१५) सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
१६) जिल्हाधिकारी, पालघर.
१७) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, पालघर.
१८) संचालक, पाणी व स्वच्छता सहाय संस्था(वासो), बेलापूर, नवी मुंबई.
१९) मु.अ. तथा वि.का.अ. पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
२०) मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, ठाणे.
२१) अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, ठाणे
२२) संचालक (वित्त), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, सिडको भवन, बेलापूर,नवी मुंबई.
२३) उपसंचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे
२४) वरिष्ट भूवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पालघर.
२५) कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण विभाग, पालघर.
२६) कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, पालघर.
२७) निवड नस्ती कार्यासन पापु-०६.